**दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी अर्थसहाय्य योजानांतर्गत पुरस्कार प्राप्त मराठी चित्रपटांना अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक: मचिअ २०११/प्र.क्र.०९/सां.का.१
मंत्रालय (विस्तार) भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०११

वाचा : १) तत्कालिन सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभागाचा क्रमांक - मचिअ-२००४/प्र.क्र.३०५/सां.का.१, दिनांक ११.१०.२००५ चा शासन निर्णय,
२) महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्या., दादासाहेब फाळके चित्रनगरी गोरेगांव मुंबई यांची दि. ४.१२.२०१० आणि १८.२.२०११ ची पत्रे.

**प्रस्तावना :** उपरोक्त संदर्भ क्र.१ येथे नमूद दि.११.१०.२००५ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील ३ नुसार ज्या मराठी चित्रपटांना राज्य / केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय पारितोषिक मिळाले आहे किंवा ज्या मराठी चित्रपटांची कोणत्याही केंद्र / राज्य शासन मान्यताप्राप्त राष्ट्रीय / आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या पॅनोरमा सेक्शन मध्ये निवड झाली आहे असे चित्रपट अ दर्जाचे असल्याचे गृहीत धरुन त्यांना चित्रपट अनुदान योजने अंतर्गत परिक्षण समितीव्दारा छाननी न करता अर्थसहाय्य मंजूर करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. यास अनुसरुन चित्रनगरी महामंडळाच्या संदर्भिय क्रमांक २ येथे नमूद दि.४.१२.२०१० आणि दि. १८.२.२०११ च्या पत्रान्वये ४१ व्या आंतरराष्ट्रीय फिल्म फेस्टिवलच्या इंडियन पॅनोरामा सेक्शनमध्ये निवड झालेल्या मे.A ४ क्रिएशन्स यांच्या "पैल ते सुंबरान" सुधारित नाव "सुंबरान -सोनेरी दिवसांच्या सोनेरी आठवणी" या चित्रपटासाठी रू.२० लाख आणि ४७ व्या मराठी चित्रपट पुरस्कार २००९-१० मध्ये उत्कृष्ट चित्रपट क्र. २ चा पुरस्कार मिळालेला मे. कोजितो एंटरटेनमेंट (इंडिया) प्रा.लि.यांच्या "झिंग चिक झिंग" या चित्रपटास प्रत्येकी रुपये २०.०० लक्ष प्रमाणे एकूण रुपये ४०.०० लक्ष इतके अर्थसहाय्य मंजूर करण्याची विनंती केली आहे. या प्रस्तावास अनुसरून पारितोषिक प्राप्त मराठी चित्रपटांना रुपये ४०.०० लक्ष इतके अनुदान मंजुर करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :** विचाराअंती शासनाने खाली नमूद चित्रपटांना प्रत्येकी रुपये २०.०० लक्ष याप्रमाणे एकूण रुपये ४०.०० लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

| अ. क्र. | चित्रपट निर्मिती संस्था | चित्रपटाचे नांव | पारितोषिक किंवा पॅनोरमा मध्ये निवड झाल्याचा तपशिल | अनुज्ञेय अर्थसहाय्य (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | मे.A ४ क्रिएशन्स | पैल ते सुंबरान (सुधारित नाव सुंबरान -सोनेरी दिवसांच्या सोनेरी आठवणी ) | ४१ व्या आंतरराष्ट्रीय फिल्म फेस्टिवलच्या इंडियन पॅनोरामा सेक्शनमध्ये निवड | २०.०० |
| २ | मे. कोजितो एंटरटेनमेंट (इंडिया) प्रा.लि. | झिंग चिक झिंग | ४७ व्या मराठी चित्रपट पुरस्कार २००९-१० मध्ये उत्कृष्ट चित्रपट क्र. २ चा पुरस्कार | २०.०० |
| | | | **एकूण** | **४०.००** |

C:\Documents and Settings\new\Desktop\marathi.doc

२.	यासाठी होणारा खर्च लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती, (००) १०२-कला संस्कृती प्रचालन, (०३) (०७) मराठी चित्रपट निर्मितीसाठी सहायक अनुदाने (२२०५ १५९९) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) मागणी क्रमांक झेडडी-२ या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून व तसेच मंजूर करण्यात आलेल्या कॅश फ्लो नुसार भागविण्यात यावा.

३.	या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव मुंबई यांच्याकडे वितरीत करण्यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव मुंबई यांना सदर रक्कम एकरकमी त्वरीत वितरीत करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाुसार व नावाने,

**सही/-**
**( अ.ल.पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी गोरेगांव (पूर्व) मुंबई ४०००६५.
संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक ,महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा परीक्षा ), एक ,महाराष्ट्र, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग (व्यय १४) (अर्थसंकल्प ११), मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
(यांना उक्त अनुदानाची रक्कम BDS व्दारे उपलब्ध करून देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
निवड नस्ती - सां.का.१